**महानिर्मिती कंपनीच्या सौर ऊर्जा प्रकल्पासाठी के.एफ.डब्ल्यू जर्मन बँकेकडून प्राप्त झालेल्या कर्जाच्या रकमेचे समायोजनाने वितरण करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. समायोजन-२०१६/प्र.क्र.९९(३)/ऊर्जा-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक - ३१ मार्च, २०१७

वाचावे :- महालेखाकार कार्यालयाचे पत्र D.O.ACII/CAORB/CH-१/२०१५-१६/३३५ दिनांक २२/०७/२०१६

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनीच्या धुळे जिल्ह्यातील मौ.शिवाजीनगर येथील १५० मेगावॅट सौर ऊर्जा प्रकल्प, ह्या बाह्ययसहाय्यित प्रकल्पासाठी केंद्र शासनाच्या पुढाकाराने के.एफ.डब्ल्यू जर्मन बँकेकडून दोनशे पन्नास मिलियन युरो इतके कर्ज मंजूर झाले आहे. के.एफ.डब्ल्यू जर्मन बँकेकडून मिळणारी कर्जाची रक्कम केंद्र शासनाकडून भारतीय रिझर्व्ह बँकेमार्फत थेट महानिर्मिती कंपनीला वितरीत होत असली तरी ती राज्य शासनाच्या लेख्यांमध्ये वर्ग केली जाते. प्रस्तुत प्रकल्पासाठी राज्य शासनाच्या लेख्यात वर्ग झालेली रक्कम कंपनीला वितरीत करण्यासाठी स्वतंत्र लेखाशिर्ष उपलब्ध नसल्यामुळे महालेखापाल कार्यालयाने कर्जाच्या रकमा निलबन खात्यामध्ये वर्ग केल्या होत्या. ह्या रकमा दीर्घ कालावधीसाठी निलंबन खात्यामध्ये वर्ग करुन ठेवणे योग्य नसल्यामुळे त्या योग्य त्या लेखाशीर्षाखाली वर्ग करुन पुस्तकी समायोजन करण्याबाबत महालेखापाल कार्यालयायने सूचित केले आहे. सदर प्रयोजनासाठी वित्तीय वर्ष सन २०१६-१७ मध्ये रु.१५०,५९,००,०००/- इतकी तरतूद करण्यात आली आहे. सदर तरतुदीमधून रु.२५,६०,५५,५३४/- (रुपये पंचवीस कोटी साठ लाख पंचावन्न हजार पाचशे चौतीस फक्त) इतकी रक्कम समायोजनाद्वारे वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचारधीन होता.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनीच्या धुळे जिल्ह्यातील मौ. शिवाजीनगर येथील १५० मेगावॅट सौर ऊर्जा प्रकल्प, ह्या बाह्य सहाय्यीत प्रकल्पासाठी केंद्र शासनाच्या पुढाकाराने के.एफ.डब्ल्यू जर्मन बँकेकडून दोनशे पन्नास मिलियन युरो इतके कर्ज मंजूर करण्यात आले आहे. त्यानुसार महानिर्मिती कंपनीला सन २०१६-१७ मध्ये मंजूर झालेल्या तरतुदीमधून रु.२५,६०,५५,५३४/-(रुपये पंचवीस कोटी साठ लाख पंचावन्न हजार पाचशे चौतीस फक्त) इतकी रक्कम समायोजनाद्वारे वितरीत करण्यास मंजूरी देत आहे.

२. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या कर्जाची रक्कम ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आलेली आहे,त्याच कारणासाठी उपयोगात आणली जाईल याची खातरजमा करावी.

३. वरील बाबींचा खर्च "मागणी क्रमांक के-११, ६८०१ वीज प्रकल्पासाठी कर्जे, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे (००), (००)(०४) सौर ऊर्जा प्रकल्पासाठी के.एफ.डब्ल्यू जर्मन बँकेकडून महाराष्ट्र राज्य वीज निर्मिती कंपनीला कर्जे, ६८०१०६६५ योजनांतर्गत ५५ कर्जे व आगाऊ रकमा" या लेखाशिर्षा खाली खर्ची टाकावा व तो सन २०१६-१७ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतुदीमधुन समायोजित करण्यात यावा.

४. सदर रकमेचे पुस्तकी समायोजन महालेखापाल मुंबई यांचे अखत्यारित व अधिकाररात करण्यात येत असल्याने या रकमेचे देयक तयार करण्यात येऊ नये.

५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१ यांनी त्यांच्या अखत्यारीत व अधिकारात रु.२५,६०,५५,५३४/- (रुपये पंचवीस कोटी साठ लाख पंचावन्न हजार पाचशे चौतीस फक्त) चे पुस्तकी समायोजन करुन शासनास तसे कळवावे.

६. हा शासन निर्णय, नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र ११५/१७/व्यय-१६ दिनांक २७/०२/२०१७ नुसार दिलेल्या सहमतीने तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.११५/२०१७ - व्यय-१६,दिनांक ३१/०३/२०१७ मधील मंजूरीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१७०४०६१११११२००११० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vilas
Mahadeorao
Rajurkar

Digitally signed by Vilas Mahadeorao Rajurkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry, Energy And Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=83469494bac86099a320f3e14bf8421ee9d2b48e344470b76ea2595df04951b4, serialNumber=02c5c00269dd48836be0d9939bdff848a9ff1f1a9fd195baf3a104d09b0817d9, cn=Vilas Mahadeorao Rajurkar
Date: 2017.04.06 11:11:17 +05'30'

( वि.म.राजुरकर )
शासनाचे अवर सचिव

**प्रत:-**

१) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्यादित, प्रकाशगड, वांद्रे, (पूर्व), मुंबई-५१

२) महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.

३) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.

४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.

५) अधिदान व लेखा अधिकारी, अराप / रालेवि-१), मुंबई.

६) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.

७) निवासी लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०००५१.
८) अवर सचिव (रोख), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.
९) विशेष कार्य अधिकारी (ऊर्जा-५), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१०) क.अ.अधिकारी (प्रशा-५), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.
११) वित्त विभाग, (अर्थसंकल्प-१३ / साधनसंपत्ती / साऊ / व्यय-१६) मंत्रालय, मुंबई-३२.
१२) मुख्य विद्युत निरीक्षक, उद्योग,ऊर्जावकामगारविभाग,सार्वजनिक बांधकाम प्रशासकीय इमारत, कर मार्ग रामकृष्ण चेंबूर, ३ रा मजला, चेंबुर, (पूर्व), मुंबई-४०००७१.
१३) मुख्य अभियंता (विद्युत) जल विद्युत प्रकल्प, मुंबई ४००००१
१४) कक्ष अधिकारी(ज.वि) जल संपदा विभाग,मंत्रालय मुंबई.
१५) निवडनस्ती (ऊर्जा-३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.